सन २०१४-१५ या वित्तिय वर्षात रुग्णालय तत्त्वावरील स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान वितरित करणेबाबत..

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः कुनिका २०१५/प्र. क्र. १२८ /आरोग्य -५

मंत्रालय, मुंबई ४०००३२.

**तारीख: ३१ मार्च, २०१५**

**वाचा :**

१) सह संचालक, आरोग्य सेवा, (क्षय व कुष्ठ), पुणे यांचे क्र. ससंआसे/कुष्ठ व क्षय/कक्ष-१०२ /१०५९२-९३/२०१५, दिनांक २०/३/२०१५.

२) सह संचालक, आरोग्य सेवा, (क्षय व कुष्ठ), पुणे यांचे क्र. ससंआसे/कुष्ठ व क्षय/कक्ष-१०२ /१०५९०-९१/२०१५, दिनांक २०/३/२०१५.

३) सह संचालक, आरोग्य सेवा, (क्षय व कुष्ठ), पुणे यांचे क्र. ससंआसे/कुष्ठ व क्षय/कक्ष-१०२ /७५९२-९३/२०१५, दिनांक २५/२/२०१५.

४) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकःकुनिका२०११/प्र क्र ३२१/आरोग्य -५, दिनांक २१ मार्च, २०१२

५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दिनांक ९ फेब्रुवारी, २०१५.

**प्रस्तावना :**

उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक-४ येथील शासन निर्णयानुसार रुग्णालय तत्त्वावरील कुष्ठरुग्णांसाठी रु.२,२००/- प्रमाणे प्रतीरुग्ण व दरमहा संस्थेने प्रत्यक्ष भरती केलेल्या रुग्णांप्रमाणे अनुदान देण्यात येते. याकरीता सन २०१४-१५ या वित्तिय वर्षाकरीता रुग्णालय तत्त्वावरील स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदान देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

रुग्णालय तत्त्वावरील स्वयंसेवी संस्थांना सहायक अनुदाने देण्यासाठी ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली रु.२७०.०० लक्ष इतके सहायक अनुदान (योजनेतर) सन २०१४-१५ या वर्षाकरीता अर्थसंकल्पित करण्यात आले आहे. रु.२२९.०० लक्ष इतके सहायक अनुदान सह संचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षय), पुणे यांच्या कार्यालयास यापूर्वीच वितरीत करण्यात आले आहे. सदर अनुदानातून खाली दर्शविल्याप्रमाणे स्वयंसेवी संस्थांना एकूण रु.७५,७५,९७६/- (रुपये पंच्याहत्तर लक्ष पंच्याहत्तर हजार नऊशे श्याहत्तर फक्त) इतके सहायक अनुदान दिनांक २१ मार्च, २०१२ च्या शासन निर्णयातील अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे. तसेच सन २०१३-१४ या वर्षी वितरीत केलेल्या निधीचे उपयोगीता प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीच्या अधीन राहून प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थांची नावे | कालावधी | प्रत्यक्ष हजर रुग्ण | देय अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | रिचर्डसन लेप्रसी हॉस्पिटल, मिरज, जि.सांगली | जानेवारी २०१४ ते मार्च २०१४ | २२८ | रु.२,२७,३४८/- |
| | | एप्रिल २०१४ ते जून २०१४ | ३०६ | रु.२,२८,४०१/- |
| २ | मराठवाडा लोकसेवा मंडळ नेरली, जि.नांदेड | ऑक्टोबर २०१३ ते सप्टेंबर २०१४ | १०७ | रु.२,२६,३८४/- |
| ३ | कुष्ठरोग निवारण समिती, शांतीवन नेरे, जि. रायगड | जून २०१४ ते ऑगस्ट २०१४ | ४६ | रु.१,२६,६२७/- |
| | | सप्टेंबर २०१४ ते नोव्हेंबर २०१४ | ७० | रु.१,३५,१६७/- |
| ४ | महारोगी सेवा समिती दत्तपूर जि. वर्धा | एप्रिल २०१४ ते जून २०१४ | १७५ | रु.३,८६,१८१/- |
| | | जुलै २०१४ ते सप्टेंबर २०१४ | १८९ | रु.३,८८,९६१/- |
| | | ऑक्टोबर २०१४ ते डिसेंबर २०१४ | १८४ | रु.३,७७,४०७/- |
| ५ | अहमदनगर जिल्हा कुष्ठरोग समिती, जि.अहमदनगर | जानेवारी २०१४ ते डिसेंबर २०१४ | ४०१ | रु.८,३३,७६८/- |
| ६ | विदर्भ महारोगी सेवा मंडळ, तपोवन, जि.अमरावती | जानेवारी २०१४ ते डिसेंबर २०१४ | १७१० | रु.३३,०४,७८७/- |
| ७ | लेप्रसी हॉस्पिटल सोलापूर, म.न.पा. संचालित | फेब्रुवारी २०१४ ते ऑगस्ट २०१४ | ५१० | रु.६,५१,६५०/- |
| ८ | कुष्ठरोग दवाखाना वडोली, ता.तलासरी, जि.ठाणे | डिसेंबर २०१३ ते जून २०१४ | २७३ | रु.५,४९,१७१/- |
| ९ | एडुलजी फ्रेमजी हॉस्पिटल, (बीपीएल) मुंबई | फेब्रुवारी २०१४ ते ऑगस्ट २०१४ | ७० | रु.१,४०,१२४/- |
| | एकूण | | | रु.७५,७५,९७६/- |

२. सहसंचालक (क्षय व कुष्ठ), पुणे यांनी वरील अटी पूर्ण केल्याची खातरजमा करुन संबंधित संस्थांना अनुदान अदा करण्याची कार्यवाही करावी.

३. याबाबतचा खर्च मागणी क्र.आर-१, २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य (०१)(१२) कुष्ठरोग्यांना प्रतिव्यक्ती अनुदाने देण्यासाठी सहायक अनुदाने (२२१० ०६८ ३), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५०/२०१५/व्यय-१३, दिनांक ०३/०३/२०१५ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३११०५२३१३११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayshree Suresh Jadhav

Digitally signed by Jayshree Suresh Jadhav
DN: CN = Jayshree Suresh Jadhav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.03.31 12:24:36 +05'30'

**(ज. सु. जाधव)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१)महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), मुंबई.

२)जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

४)निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई

५)संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

६)सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षय), पुणे

७)सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.

८)वित्तविभाग, (व्यय.१३) मंत्रालय, मुंबई

९)सार्वजनिक आरोग्य विभाग, (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई

१०)निवडनस्ती (आरोग्य-५)